वैध मापन शास्त्र  यंत्रणेअंतर्गत निरीक्षक गट-ब
(राजपत्रित)  यांचे बदलीबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग,स**
**शासन आदेश क्रमांक - बदली-२०१८ /प्र. क्र. ७३/ग्रासं-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक -  ३० ऑगस्ट, २०१८

**शासन आदेश :-**

सार्वजनिक सेवेच्या हितार्थ महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियमन व शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणा-या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ च्या कलम ४ (३), ४ (४) (२ ) व ५  मधील तरतुदीनुसार बदली करण्यास सक्षम असलेल्या प्राधिकारांच्या मान्यतेने वैधमापन शास्त्र यंत्रणेतील खालील अधिका-यांच्या त्यांच्या विनंतीनुसार त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या ठिकाणी बदली करण्यात येत आहे. बदलीनंतर संबंधित अधिका-याची नियुक्ती त्यांच्या नावासमोरील स्तंभ क्र. ४ मध्ये दर्शविलेल्या पदावर करण्यात येत आहे. :-

| अ.क्र. | अधिका-यांचे नाव | सध्याच्या पदावर कार्यरत असल्याचे ठिकाण | बदलीचे ठिकाण |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | श्री. र. भ. जाधव | निरीक्षक, वैधमापन शास्त्र गोरेगांव विभाग-२ | अंधेरी-१ |

२.	संबंधित निरीक्षक यांनी बदलीचे ठिकाणी इतर कोणत्याही आदेशाची प्रतिक्षा न करता हेच कार्यमुक्तीचे आदेश समजून तात्काळ रुजू व्हावे व आपला रुजू अहवाल नियंत्रक, वैधमापन शास्त्र, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना तसेच शासनास त्वरीत सादर करावा.

३.	उपरोक्त निरीक्षक यांनी नवीन पदाचा कार्यभार त्वरीत स्वीकारावा, त्यांनी अनधिकृतरित्या गैरहजर राहू नये अन्यथा त्यांची अनुपस्थिती अनधिकृत गैरहजेरी म्हणून समजण्यात येईल व विनावेतन करण्यात येईल. तसेच त्यांच्या सेवेचा खंड पडण्याची शक्यता देखिल नाकारता येत नाही.  याची जाणीव संबंधीतांना करुन देण्यात येत आहे.

४.	संबंधित अधिका-यांना नवीन पदस्थापनेच्या पदावर रुजू होणेसाठी पदग्रहण अवधी प्रवास भत्ता तसेच इतर अनुषंगिक भत्ते अनुज्ञेय राहणार नाहीत.

५. नियंत्रक, वैधमापन शास्त्र यांना कळविण्यात येते की, संबंधीत अधिका-यांनी पदभार स्वीकारल्याचा दिनांक त्वरीत शासनास कळवावा. विहित कालावधीत संबंधीत अधिकारी बदलीच्या ठिकाणी रुजु न झाल्यास, त्याबाबत शासनास त्वरीत अवगत करावे. जेणेकरुन संबंधितांविरुध्दशिस्तभंगविषयक कारवाई त्वरीत करणे शक्य होईल. महाराष्ट्र नागरी सेवा ( रजा ) नियम, १९८१ मधील नियम ३० (सी) नुसार बदली झालेल्या अधिका-यांचे रेजेचे अर्ज स्वीकारु नयेत / मंजुर करु नयेत.

६. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०१८०८३११०३६५२४५०६ असा आहे. हे शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Bhaskar
Baburao Patil

Digitally signed by Bhaskar Baburao Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Food Civil Supplier And Consumer Protection Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=bbb17268641691acddf048e6aa2150f79b022d09a6c745e92beb9baeed480e62, serialNumber=c8c342ac9a89937bf462ee75f46842ac6d1fbc12a95dda7bfd1d06d7b79b4191, cn=Bhaskar Baburao Patil
Date: 2018.08.31 10:37:58 +05'30'

**( भा. बा. पाटील )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) श्री. र. भ. जाधव, निरीक्षक, वैधमापन शास्त्र, गोरेगांव विभाग-२,

**प्रत :-**

२) नियंत्रक, वैधमापन शास्त्र, महाराष्ट्र राज्य, मुंबई
३) उपनियंत्रक, वैधमापन शास्त्र, मुंबई महानगर विभाग
४) महालेखापाल -१ ( लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५) महालेखापाल -१ ( लेखा परिक्षा ) महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
७) जिल्हा कोषागार अधिकारी,
८) मा. मंत्री, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,
९) निवड नस्ती, कार्यासन ग्रासं-३